**सोलापूर महानगरपालिकेने महासभेने पारित केलेला ठराव क्र. ५००, दि. १९/१२/२०१४ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - एमयुएन - २०१७ /प्र.क्र. २२/नवि-१८**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०६.०४.२०१७.

वाचा:- १) शासन निर्णय क्र.एमयुपी-२०१६/प्र.क्र.१७०/नवि-१९, दि.०९.०६.२०१६.
२) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र क्र. सआस/ कक्ष-२/आस्था-५/६०५, दिनांक ०२.०१.२०१७.

प्रस्तावना:-

श्री. यल्लाप्पा अंबाजी ताटीपामूल, कनिष्ठ लिपीक (सेवा निवृत्त) अग्निशामक दल सोलापूर महानगरपालिकेत कार्यरत असताना श्री. ताटीपामूल यांनी श्री. जावेद जाफर शेख, रा. सोलापूर यांनी छपाईच्या कामाच्या बिलामध्ये माल पुरवठा केल्याच्या दाखल्याकरीता श्री. शेख यांच्या कडून दिनांक ०७/०८/२०१० रोजी रु. ६८०० इतकी रक्कम लाचेच्या स्वरुपात स्विकारल्याने लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने श्री. ताटीपामूल यांना रंगेहाथ पकडण्यात आले असून त्यांच्या विरुध्द विभागीय चौकशी करण्यात येऊन चौकशीअंती त्यांच्या वरील आरोप सिध्द झाले असताना सोलापूर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेला ठराव क्र. ५०० दि. १९/१२/२०१४ हा शासनाच्या नियमाच्या तरतूदीशी विसंगत असल्याने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (१) नुसार दि.०९.०६.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आला होता.

२. आयुक्त सोलापूर महानगरपालिका यांनी त्यांच्या दिनांक ०२.०१.२०१७ च्या पत्रान्वये याबाबतचे अभिवेदन शासनास सादर केले आहे. त्यांच्या अभिवेदनानुसार महासभेचा निलंबित केलेला ठराव क्र. ५००, दिनांक १९.१२.२०१४ हा शासनाच्या ध्येय धोरणाशी विसंगत असल्याने तो ठराव विखंडीत करण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय:-**

श्री. यल्लाप्पा अंबाजी ताटीपामूल, कनिष्ठ लिपिक (सेवानिवृत्त) यांनी छपाईच्या कामाच्या बिलामध्ये मालपुरवठा केल्याच्या दाखल्याकरीता श्री. शेख यांचेकडुन दि.०७.०८.२०१० रोजी रू.६,८००/- इतकी रक्कम लाचेच्या स्वरूपात स्विकारल्याने लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने त्यांना रंगेहाथ पकडले होते व या प्रकरणी त्यांच्या विरूध्द विभागीय चौकशी करण्यात येऊन चौकशीअंती त्यांच्यावरील आरोप सिध्द झाल्याने श्री. ताटीपामूल यांना महानगरपालिकेच्या सेवेतुन दि.२९.०९.२०१४ रोजी बडतर्फ करण्यात आले होते.

सदर प्रकरणी सोलापूर महानगरपालिकेच्या महासभेने पारीत केलेला ठराव क्र.५००, दि.१९.१२.२०१४ या अधिनियमाच्या कलम ४५१ (१) अन्वये उक्त नमूद शासन निर्णयाव्दारे निलंबित करण्यात करण्यात आला होता.

सदर प्रकरणी वस्तुस्थिती व अभिवेदन विचारात घेता ठराव क्र.५०० दि.१९.१२.२०१४ हा शासनाच्या ध्येय धोरणाशी विसंगत व भ्रष्टाचारास पाठींबा देणारा असल्याने सोलापूर महानगरपालिकेच्या महासभेने पारीत केलेला ठराव क्र.५००, दि.१९.१२.२०१४ या अधिनियमाच्या कलम ४५१ (३) अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०१७०४०६११३७०६९४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anish Raman Parshurame

Digitally signed by Anish Raman Parshurame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5ec58fef33f1b3244a3957d134f915dcb444ab4953880ff670e5eca3d7a9f53b, cn=Anish Raman Parshurame
Date: 2017.04.06 11:38:07 +05'30'

**( अनिष परशुरामे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महापौर, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर
२. आयुक्त, सोलापूर महानगरपालिका
३. श्री. यल्लप्पा अंबाजी ताटीपामूल, मार्फत आयुक्त, सोलापूर महानगरपालिका.
४. सचिव (नवि-२), याचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवड नस्ती, कार्यासन नवि-१८.